सामुहीक विवाह सोहळ्यामध्ये भाग घेऊन विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दांपत्यांसाठी असलेल्या कन्यादान योजनेत बदल... अनुदानात वाढ

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक : सावियो-२०२२/प्र.क्र.१११/सामासु
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० एप्रिल, २०२५.

संदर्भ :
१) शासन निर्णय सा.न्या.सां.का.क्री. व व वि.स.वि.क्र. सावियो-२००३ / प्र.क्र.७ / सुधार-१ दि. २४.१२.२००३
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग सावियो-२००५/प्र.क्र. ४१/ सुधार-१ दि. १८.१२.२००८
३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग सावियो-२०१५/प्र.क्र. १०५/ सुधार-१ दि. १५.१०.२०१६.
४) आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांचे पत्र क्रमांक सकआ/मावक/कन्यादान/अनुदान वाढ/२०२४-२५ /का-१२/१५५८,दिनांक २८.०२.२०२५.

प्रस्तावना :

राज्यात अनुसूचित जाती, विमुक्त जाती,भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील कुटुंबातील सामुहिक विवाह सोहळयामध्ये सहभागी होणाऱ्या जोडप्यांना कन्यादान योजनेतंर्गत रु.१०,०००/- इतके अर्थसहाय्य देण्याची योजना शासनाच्या दि.२४ डिसेंबर, २००३ च्या शासन निर्णयान्वये सन २००३-०४ पासून लागू करण्यात आली आणि प्रत्येक जिल्हयामध्ये १०० जोडप्यास या योजनेचा लाभ देण्यात यावा असा निर्णय घेण्यात आला. सदर शासन निर्णयान्वये विवाह करणा-या दांपत्यास मंगळसुत्रासाठी रु.६,०००/- व संसारोपयोगी साहित्यासाठी रु.४०००/- असे एकूण रु.१०,०००/- इतके अर्थसहाय्य देण्यात येत होते. त्यानंतर सदर दिनांक २४.१२.२००३ चा शासन निर्णय अधिक्रमित करून शासन निर्णय संदर्भ क्रमांक ३ येथील दि.१५ ऑक्टोबर, २०१६ अन्वये या योजनेतंर्गत सामुहिक विवाह सोहळयांमध्ये भाग घेऊन विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दांपत्यांना व स्वयंसेवी संस्थांना अनुक्रमे रु.२०,०००/- व रु.४,०००/- याप्रमाणे अनुदानात वाढ करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर अनुदानाची रक्कम ही सन २०१५ मध्ये म्हणजेच १० वर्षापुर्वी निश्चित केलेली आहे. त्यामुळे मा. मंत्रिमंडळाने दि.१३ मार्च,२०२४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार महिला व बाल विकास विभागामार्फत दि.१४ मार्च, २०२४ च्या शासन निर्णयान्वये राबविण्यात येणाऱ्या "शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह" योजनेच्या धर्तीवर योजनेमध्ये एकसुत्रीपणा असण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या "कन्यादान" योजनेंतर्गत सामुहिक विवाह सोहळयांमध्ये भाग घेऊन विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दांपत्यांना प्रती जोडपे रु.२०,०००/- वरुन रु.२५,०००/- इतके वाढीव अनुदान मंजूर करण्यास तसेच "कन्यादान" योजनेंतर्गत स्वयंसेवी संस्थांना सद्यस्थितीत रु.४,०००/- अनुदान देण्यात येत असल्यामुळे ते कायम ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

सामुहिक विवाह सोहळ्यामध्ये भाग घेऊन विवाह करण्याऱ्या मागासवर्गीय दांपत्यासाठी कन्यादान योजना संदर्भाधीन दिनांक २४ डिसेंबर, २००३ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सामुहिक विवाह सोहळ्यामध्ये भाग घेऊन विवाह करणाऱ्या जोडप्यांना देण्यात येणाऱ्या रु. २०,०००/- या अनुदानात वाढ करुन रु. २५,०००/- व स्वयंसेवी संस्थांसाठी रु. ४,०००/- इतके अनुदान देण्यास सदर शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेचे निकष /अटी व शर्ती संदर्भ क्र. २ येथील दि. १८ डिसेंबर, २००८ च्या शासन निर्णयाप्रमाणे कायम राहतील.

३. सदर योजनेतील लाभार्थीना शासनाच्या अन्य विभागाकडून राबविण्यात येणाऱ्या सामुहिक विवाह योजनेतंर्गत लाभ घेता येणार नाही.

४. संबधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी कार्यालयामार्फत अनुदानाची रक्कम **थेट लाभार्थी हस्तांतरण** (DBT) पध्दतीने संबधीत लाभार्थ्याच्या खाती जमा करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णयातील तरतूदी शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

६. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र. एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती विशेष घटक योजना (११) आंतरजातीय विवाह, (१४) (०२) कन्यादान योजनेखाली नवदांपत्यांना अर्थसहाय्य (कार्यक्रम) (२२२५ जी ३२१) योजनेंतर्गत/दत्तमत"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०९/२०२५,कार्यासन -१४१३, दि.१३ मार्च, २०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३२७/२०२५/व्यय-१४, दि. २२ एप्रिल,२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०४३०१६२१२३२८२२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2025.04.30 16:22:08 +05'30'

**( राजेश मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व मंत्री/राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव, मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व विभागीय आयुक्त
७. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सहायक आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. महालेखापाल १ /२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
११. निवासी लेखा अधिकारी,मुंबई
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
१४. सर्व जिल्हा विवाह नोंदणी अधिकारी
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६. सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी
१७. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण अधिकारी
१८. सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद

१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२०. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४१३), मंत्रालय, मुंबई.
२१. सहसचिव वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
२२. सह सचिव / सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सा.न्या. व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई.
२३. निवडनस्ती (सामासु)